महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ (कृषि उपसंचालक) या संवर्गातून अधिक्षक कृषि अधिकारी, गट-अ संवर्गात पदोन्नती.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्रमांक: आकृवि २४२२/प्र.क्र.१५०/१५-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक: २१ जून, २०२३.

**संदर्भ**:- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६-ब,दि.०७/०५/२०२१,
२) मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण ,मुंबई यांनी मुळ अर्ज क्र. ९३१/२०२२ मध्ये दिनांक १५/०२/२०२३ रोजी पारीत केलेले आदेश.

**शासन आदेश** :-

संदर्भाधीन क्र. २ येथे नमूद मुळ अर्ज क्र. ९३१/२०२२ मध्ये मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने दिनांक १५/०२/२०२३ रोजी दिलेल्या आदेशास अनुसरुन, महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ (कृषि उपसंचालक) संवर्गातून महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ (अधिक्षक कृषि अधिकारी) या संवर्गात तात्पुरत्या पदोन्नतीसाठी या विभागामार्फत तयार करण्यात आलेल्या सन २०२१-२२ च्या पूरक निवडसुचीस सामान्य प्रशासन विभागाने सहमती दिली आहे. त्यानुसार खाली नमुद अधिकाऱ्यास_महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ (कृषि उपसंचालक) (वेतनश्रेणी एस-२० : रु.५६१०० - १७७५००) संवर्गातून सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोईच्या दृष्टीने महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ (अधिक्षक कृषि अधिकारी) (वेतनश्रेणी एस-२३: रु.६७७०० - २०८७००) या संवर्गात निव्वळ तात्पुरत्या पदोन्नतीने खालीलप्रमाणे पदस्थापना देण्यास या शासन आदेशान्वये शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| अ. क्र. | कृषि उप संचालक ज्ये.क्र. | सन २०२१-२२ च्या पूरक निवड सूचीतील अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व पदनाम | वाटप महसुल विभाग | पदोन्नतीने पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| १ | २९ | १ | श्री.शाह आरिफ अहमद गुलाम दस्तगीर<br>उपसंचालक, डॉ.पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशन, अकोला | अमरावती | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, वाशिम<br>(रिक्त पदी) |

२. उपरोक्त तात्पुरती पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

**(अ)** सदर तात्पुरती पदोन्नती ही मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४/०८/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या व प्रलंबित असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ मधील निर्णयास अधिन राहुन देण्यात येत आहेत.

**(आ)** रिट पिटीशन स्टॅम्प नं.१०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टॅम्प नं.१०८७८/२०२१ मध्ये मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि.२५/०५/२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर पदोन्नती नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहील.

**(इ)** सदर पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्यामुळे पदोन्नतीच्या दिनांकापासून सेवाज्येष्ठतेचा हक्क सांगता येणार नाही.

३. श्री.शाह आरिफ अहमद गुलाम दस्तगीर ,उपसंचालक, डॉ.पंजाबराव देशमुख जैविक शेती मिशन, अकोला यांनी त्यांच्या सध्याच्या पदाचा पदभार तात्काळ कार्यालयातील निकटतम ज्येष्ठ अधिकाऱ्यांकडे सोपवून तात्काळ पदोन्नतीच्या पदावर रुजू व्हावे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६२११५०००२३६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AMOL NILAKANTH SAKHARKAR

Digitally signed by AMOL NILAKANTH SAKHARKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=36b60751d094e56d974e1a44ec234c475fb0de5b35a79c1cf69a588f212b260e, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=BB4888CEBBF4B7A6440C6531A52925E3C8140B1C28DF723D8F006D11BC169A08, cn=AMOL NILAKANTH SAKHARKAR
Date: 2023.06.21 15:01:52 +05'30'

**( अ. नि. साखरकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री (कृषि) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मंत्री (फलोत्पादन) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव ,(सेवा)सामान्य प्रशासन विभाग.मुंबई ,मंत्रालय ,
४. अपर मुख्य सचिव (कृषि) कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई ३२
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा)१/२ महाराष्ट्र मुंबई /नागपूर.
६. आयुक्त (कृषि) कृषि आयुक्तालय , पुणे
७. सर्व सह सचिव /उप सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सर्व कृषि संचालक व्दारा आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय, पुणे
९. सहसंचालंक(आस्थापना), कृषि आयुक्तालय , पुणे
१०. सर्व कृषि सहसंचालक/सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी व्दारा कृषि आयुक्तालय, पुणे
११. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (द्वारा-आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे)
१२. संबंधित अधिकारी व्दारा आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय, पुणे
१३. निवडनस्ती १५ अे कार्यासन.